मराठी विश्वकोशाच्या अद्ययावतीकरणासाठी स्थापन करण्यात आलेल्या ज्ञानमंडळांच्या खर्चाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विनिमं-२०२०/प्र.क्र.६१/भाषा-२**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ ऑगस्ट, २०२०

**वाचा :-**

१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. विनिमं-२०१३/प्र.क्र.३०/भाषा-२, दि.१८.०९.२०१४
२) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. मविनि-२०१३/प्र.क्र.७०/भाषा-२, दि.१०.०२.२०१५ व समक्रमांक दि.१०.३.२०१५ चे शुद्धीपत्रक
३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र विकोश-२०१५/प्र.क्र.१७१/भाषा-२, दि२३.०२.२०१६.
४) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र विकोश-२०१८/प्र.क्र.१११/भाषा-२, दि.२२.०२.२०१९
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थस- २०२०/प्र.क्र.६५/भाषा-२, दि. ४ मे, २०२०
६) महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे पत्र क्र.विनिमं-२०२०/प्र.क्र. ०४/ज्ञानमंडळ/४२९, दि. २६.०६.२०२०

**प्रस्तावना :-**

विश्वकोशातील सर्व खंडातील अनेक नोंदी कालबाह्य झालेल्या असल्याने त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २३ फेब्रुवारी २०१६ च्या शासन निर्णयान्वये विषयनिहाय ज्ञानमंडळांची स्थापना करण्यात आली आहे. ज्ञानमंडळांनी करावयाच्या कामाची कार्यपद्धतीदेखील सदर शासन निर्णयात ठरवून देण्यात आली आहे. त्यानुसार ज्ञानमंडळांनी सर्व विषयातील ज्ञानशाखांमध्ये झालेले बदल विचारात घेऊन विश्वकोशातील नोंदींचे अद्ययावतीकरण करणे आवश्यक आहे. ज्ञानमंडळांबरोबर करण्यात आलेल्या करारानुसार प्रत्येक ज्ञानमंडळांकडून प्रतिवर्षी शंभर ते दोनशे नोंदी येणे आवश्यक आहे. सर्व ज्ञानमंडळांनी त्यांना नेमून दिलेल्या विषयाच्या विश्वकोशाच्या नोंदीचे संपूर्ण अद्ययावतीकरण तीन वर्षात पूर्ण करणे अपेक्षित होते. तथापि, महाराष्ट्र मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातर्गत ज्ञानमंडळांचा आढावा घेतला असता, ज्ञानमंडळावरील खर्चाच्या मानाने त्यांच्याकडून मिळणाऱ्या नोंदींचे प्रमाण खूपच कमी असल्याचे निदर्शनास आले. कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या प्रादुर्भावामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात राज्याची कर व करेतर उत्पन्नातील अपेक्षित महसुली घट व त्याचे राज्याच्या अर्थव्यवस्थेवर होणारे परिणाम विचारात घेऊन वित्त विभागाने शासन निर्णय दिनांक ४ मे २०२० अन्वये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यक्रमांतर्गत सर्व चालू योजनांचा आढावा घेऊन खर्चावर नियंत्रण आणावयाचे आहे तर, काही योजना रद्द करावयाच्या आहेत. त्यानुसार वित्त विभागाने दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने ज्ञानमंडळावरील खर्च नियंत्रणात आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

सद्यःस्थितीत अर्थव्यवस्थेवर होत असलेल्या प्रतिकूल परिणामांमुळे शासनाने विविध योजनांवरील अनावश्यक खर्च कमी करून काटकसर करण्याचे धोरण अवलंबले आहे. शासनाच्या या काटकसरीच्या धोरणाच्या अनुषंगाने, महाराष्ट्र मराठी विश्वकोश निर्मिती मंडळांतर्गत ज्ञानमंडळांवर करण्यात येणारा खर्चाबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१) **समन्वयक मानधन :-** सध्या अस्तित्वात असलेल्या ज्ञानमंडळांसाठी जे समन्वयक कार्यरत आहेत, त्यांनी नोंदी केल्या किंवा नाही केल्या तरी, त्यांना प्रति माह रुपये १५,००० /- म्हणजेच वार्षिक रुपये १,८०,०००/- हजार इतके मानधन प्रति समन्वयक अदा करण्यात येत आहे. त्याऐवजी यापुढे ज्ञानमंडळामार्फत करण्यात येणाऱ्या नोंदींची सांगड समन्वयकांच्या मानधनाबरोबर घालण्यात येईल. समन्वयकांना यापुढे प्रति नोंदीसाठी रुपये पाचशे (रु. ५००/- ) इतके मानधन अदा करण्यात येईल, म्हणजेच प्रतिवर्षी समन्वयक जेवढ्या नोंदी करेल त्या प्रमाणात नोंदनिहाय मानधन समन्वयकास अदा केले जाईल. अशाप्रकारे यापुढे समन्वयकांच्या मानधनावरील खर्च कामाच्या प्रमाणात असेल. नोंदी जास्त झाल्या तर जास्त मानधन व नोंदी कमी झाल्या तर कमी मानधन समन्वयकास मिळेल. ज्ञान मंडळांच्या समन्वयक पदावर काम करीत असलेले बहुतांश समन्वयक हे विद्यापीठ, शैक्षणिक संस्था इत्यादींमध्ये मोठ्या पदांवर कार्यरत असणाऱ्या तज्ज्ञ व्यक्ती आहेत. सध्या कोविड १९ च्या पार्श्वभूमीवर निर्माण झालेल्या बिकट आर्थिक परिस्थितीत नोंदनिहाय मानधनाच्या नवीन कार्यप्रणालीवर काम करण्यासाठी सर्व समन्वयकांना आवाहन करण्यात येत आहे.

२) **बैठका/कार्यशाळा/प्रशिक्षण वर्ग** :- यापुढे ज्ञानमंडळांच्या लेखक कार्यशाळा / प्रशिक्षण वर्ग तसेच तज्ञ सल्लागार बैठका आधुनिक संगणकीय तंत्रज्ञानाच्या दृक-श्राव्य माध्यमांचा वापर करून (व्हिडिओ कॉन्फरन्सिंग /वेबिनार) घेण्यात याव्यात. याप्रमाणे बैठका घेतल्यामुळे लेखक, विषयतज्ज्ञ यांच्या प्रवासावर होणाऱ्या वेळेमध्ये व खर्चामध्ये देखील बचत होईल. तसेच बैठकांचे इतिवृत्त अभिलेख हे संगणकीय पध्दतीने (सॉफ्ट कॉपी) रितसर जतन करुन ठेवण्यात यावेत.

२. उपरोक्त परिच्छेदात नमूद केलेल्या बाबी वगळता दिनांक २३ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदी, अटी व शर्ती कायम राहतील. उपरोक्त बदलांच्या अनुषंगाने ज्ञानमंडळांच्या नोंदी, लेखन, समीक्षण व संपादन या संदर्भात ज्ञानमंडळाचे विषयपालक, लेखक, संपादक तसेच महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश कार्यालयातील विद्याव्यासंगी सहाय्यक व संपादकीय सहाय्यक यांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये यामध्ये काही बदल करावयाचा असल्यास, सदर बदल मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या स्तरावर करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१८१७३९५३४०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajashri Uday Bapat

Digitally signed by Rajashri Uday Bapat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, serialNumber=2976929866c57c5b5b45c06bbd6c5983fe47bad04262c22cb9ec519621a4899f, cn=Rajashri Uday Bapat
Date: 2020.08.20 16:24:25 +05'30'

**( राजश्री बापट )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),
९) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने),
१०) प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
११) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी,
१५) कुलगुरू, सर्व विद्यापीठे
१६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
१८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
१९) वरीष्ठ लेखा अधिकारी/टि.एम., प्रधान महालेखापाल कार्यालय, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
२०) वरीष्ठ लेखा अधिकारी/टि.एम., प्रधान महालेखापाल कार्यालय, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२,नागपूर.
२१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२३) भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२४) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई
२५) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२६) प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२७) सहायक भाषा संचालक, विभागीय कार्यालय, नवी मुंबई/ पुणे/नागपूर/औरंगाबाद
२८) अवर सचिव, (१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२९) अवर सचिव, (व्यय-४)/अर्थसंकल्प-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३०) सर्व मंत्रालयीन विभाग
३१) सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई
३२) संग्रहार्थ (भाषा - २).